# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण

प्राधिकृत प्रकाशन

शुक्रवार, ऑगस्ट १०, २००७/श्रावण १९, शके १९२९

स्वतंत्र संकलन म्हणून फाईल करण्यासाठी या भागाला वेगळे पृष्ठ क्रमांक दिले आहेत


## भाग चार-अ

**महाराष्ट्र शासनाने केंद्रीय अधिनियमांन्वये तयार केलेले (भाग एक, एक-अ आणि एक-ल यांमध्ये प्रसिद्ध केलेले नियम व आदेश यांव्यतिरिक्त) नियम व आदेश.**

### वित्त विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ३० जुलै २००७

**अधिसूचना**

**भारताचे संविधान.**

क्रमांक सेनिवे. १००६/७६/सेवा-४.—भारताच्या संविधानाचा अनुच्छेद ३०९ च्या. परंतुकान्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून महाराष्ट्राचे राज्यपाल, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ ला आणखी सुधारणा करणारे पुढील नियम करीत आहेत:—

१. या नियमांस, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) (सुधारणा) नियम, २००७ असे म्हणावे.

२. महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ मधील नियम १३४ ए मध्ये, "जो सेवानिवृत्त झालेला आहे" या शब्दांपासून सुरू होणाऱ्या व "निवृत्तिवेतनातून वसूल करण्यात येईल" या शब्दांनी शेवट झालेल्या तरतूदीऐवजी खालील तरतूद घालण्यात यावी. ही तरतूद या अधिसूचनेच्या दिनांकास प्रलंबित असलेल्या तसेच या दिनांकानंतरच्या सर्व प्रकरणांना लागू ठरेल :—

"जो सेवानिवृत्त झालेला आहे किंवा ज्याला सेवानिवृत्त होण्यास परवानगी देण्यात आलेली आहे अशा शासकीय कर्मचाऱ्यास,—

(१) सेवानिवृत्तिनंतरच्या पुनर्नियुक्तीवरील कालावधीसह त्याच्या सेवेच्या कालावधीत, जर कोणत्याही कारणास्तव जादा रक्कम देण्यात आलेली आहे असे आढळले तर, किंवा

(२) जर निवृत्तिवेतनधारकाकडून अशा कालावधीतील काही रक्कम येणे आहे आणि जी रक्कम त्याने भरलेली नाही किंवा त्याचेकडून वसूल करण्यात आलेली नाही असे आढळले तर, किंवा

(३) त्याच्या सेवानिवृत्तीच्या तारखेनंतर शासकीय निवासस्थान ठेवून घेतल्यामुळे, त्याच्याकडून लायसन्स फी व शासकीय निवासस्थानाशी संबंधित अन्य येणे रक्कम यांची वसूली करावयाची आहे असे आढळले तर,

अशी जादा दिली गेलेली किंवा येणे असलेली किंवा वसूल करावयाची रक्कम, त्याला मंजूर करण्यात आलेल्या निवृत्तीवेतनातून वसूल करण्यात येईल."

३. सदर अधिसूचना, महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या वेब साईटवर उपलब्ध करण्यात आली असून तिचा संकेतांक २००७०८०३१११५८५४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**उषा प्र. महाजन,**
शासनाच्या उप सचिव.

## FINANCE DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, dated 30th July 2007

*NOTIFICATION*

CONSTITUTION OF INDIA.

No. PEN. 1006/76/SER-4.—In the exercise of the powers conferred by the proviso to article 309 of the Consitution of India, the Governor of Maharashtra is hereby pleased to make the following rules further to amend the Maharashtra Civil services (Pension) Rules, 1982, namely :—

1. These rules may be called the Maharashtra Civil Services (Pension) (Amendment) Rules, 2007.

2. In rules 134-A of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982, for the provision beginning with the words "If in the case of" and ending with the words "pension sanctioned to him" the following provision shall be substituted, and shall be made applicable to all the cases pending on and after the date of this notification :—

" If in the case of a Government servant, who has retired or has been allowed to retire,—

(i) it is found that due to any reason whatsoever an excess amount has been paid to him during the period of his service including service rendered upon re-employment after retirement, or

(ii) any amount is found to be payable by the pensioner during such period and which has not been paid by or recovered from him, or

(iii) it is found that the amount of licence fee and any other dues pertaining to Government accommodation is recoverable from him for the occupation of the Government accommodation after the retirement,

then the excess amount so paid, the amount so found payable or recoverable shall be recovered from the amount of pension sanctioned to him".

3. This Notification is available on the web site of Government of Maharashtra i.e.**"www.maharashtra.gov.in"** and its computer code number is 20070803115854001.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

USHA P. MAHAJAN,
Deputy Secretary to Government.



शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई

क्र. सेनिवे. १००६/७६/सेवा-४
**वित्त विभाग**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक ३० जुलै २००७

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (८० प्रती),
महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (८० प्रती),
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर (४० प्रती),
महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (४० प्रती),
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (४० प्रती),
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
* प्रबंधक मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयातील सर्व विभाग,
मंत्रालयाच्या निरनिराळया विभागाच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
वित्त विभागातील सर्व कार्यासने (ग्रंथपाल ५ प्रती).
निवडनस्ती, कार्यासने सेवा-४.